केंद्र पुरस्कृत "शक्ती सदन" योजनेच्या अंमलबाजणीकरिता प्रशासकीय व इतर बाबी विहीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन परीपत्रक क्रमांक- केंपुयो-२०२२/प्र.क्र.१२५/का-०३**
नवीन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - ०७ मार्च, २०२४

**वाचा :-**

१. महिला व बाल विकास मंत्रालय, केंद्र शासन यांचे पत्र क्र. DO No. WW-२३/१/२०२१-WW दि.१४ जुलै, २०२२.
२. महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.२०८/का.०२, दि.२३ मार्च,२०१८
३. महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्र.युजेजे-२०१६/प्र.क्र.१८८/का-३, दि.२७ मार्च,२०१८
४. शासन परिपत्रक क्रमांक-संकिर्ण २०२२/प्र.क्र.३०७/कार्या.०२ दिनांक ३ जानेवारी,२०२३
५. महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्र. केंपुयो-२०२२/प्र.क्र.१२५/का-०३, दि. २९ मार्च,२०२३
६. महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्र. मिशन-२०२२/प्र.क्र.३०८/का-०२, दि ५ ऑक्टोबर, २०२३.
७. महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्र. मसवि-२०२४/प्र.क्र.४३/का-०२, दि. ०६ मार्च, २०२४

**प्रस्तावना :-**

राज्यातील महिलांची सुरक्षितता व सक्षमीकरणासाठी केंद्र शासनाकडून "मिशन शक्ती" हा एकात्मिक महिला सबलीकरण कार्यक्रम १५ व्या वित्त आयोगाच्या सन २०२१-२२ ते २०२५-२६ या कालावधीकरिता वाचा क्र. १ अन्वये सुरु करण्यात आला आहे. मिशन शक्ती या योजनेंतर्गतर्गत "संबल" व "सामर्थ्य" या दोन उप-योजना राबविण्यात येत आहेत. यापैकी "सामर्थ्य" उपयोजनेंतर्गत महिलांच्या सक्षमीकरणावर भर देण्याकरिता केंद्र पुरस्कृत "स्वाधार" व "उज्ज्वला" योजना या केंद्र पुरस्कृत "मिशन शक्ती" या एकछत्री योजनेतील "शक्ती सदन" योजनेमध्ये विलीन करण्यास तसेच आर्थिक वर्ष २०२२-२३ पासून राज्यामध्ये "शक्ती सदन" योजना राबविण्याकरिता ६०:४० (केंद्र:राज्य) या प्रमाणात खर्च करण्यास वाचा क्र.५ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. या अनुषंगाने वाचा क्र. ५ येथील शासन निर्णयामध्ये नमूद केल्यानुसार "शक्ती सदन" या योजनेच्या अंमलबजावणीसंबंधीत प्रशासकीय व व्यवस्थापकीय तरतुदी विहीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

उपरोक्त वाचा क्र. ५ येथील शासन निर्णयान्वये केंद्र पुरस्कृत "स्वाधार व "उज्ज्वला" योजना या केंद्र पुरस्कृत "मिशन शक्ती" या एकछत्री योजनेतील "शक्ती सदन" योजनेमध्ये विलीन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार आर्थिक वर्ष २०२२-२३ पासून "शक्ती सदन" योजनेच्या अंमलबजावणीबाबतच्या प्रशासकीय व व्यवस्थापकीय तरतुदी पुढीलप्रमाणे विहीत करण्यात येत आहेत.

१. **स्वयंसेवी संस्था निवडीचे निकष:-**

शासन निर्णय दि. २९/०३/२०२३ मध्ये नमूद निकष पूर्ण करणा-या स्वयंसेवी संस्थांना केंद्र पुरस्कृत "शक्ती सदन" योजना राबविण्याकरीता मान्यता प्रदान करण्यात येईल. या व्यतिरीक्त संस्था निवडीचे प्रशासकीय निकष पुढीलप्रमाणे असतीलः

I. आर्थिक वर्ष २०२२-२३ व २०२३-२४ मध्ये कार्यरत असलेल्या "स्वाधार" व "उज्ज्वला" गृहांना शक्ती सदन योजनेमध्ये समाविष्ट होण्याच्या दृष्टीने पर्याप्त कालावधी उपलब्ध करुन देण्याकरिता दि. ३१ मार्च, २०२४ पर्यंत कार्यरत राहण्याची मुभा देण्यात आली आहे. शक्ती सदन योजनेच्या सर्व निकषांची पूर्तता केल्यानंतरच या संस्थांना सन २०२४-२५ पासून "शक्ती सदन" म्हणून कार्यरत राहता येईल. संबंधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांनी विभागीय उपायुक्त यांच्यामार्फत सदर संस्थांनी निकष पूर्तता केली असल्याबाबतचा अहवाल आयुक्त, महिला व बाल विकास यांचेकडे दि. ३०/०४/२०२४ पर्यंत पोहोचेल अशा प्रकारे सादर करावा.

II. तद्नंतर ज्या संस्थांना केंद्र शासनाची "स्वाधार" किंवा "उज्ज्वला" गृह म्हणून मान्यता प्राप्त आहे, व ज्या संस्था आर्थिक वर्ष २०२२-२३ व २०२३-२४ मध्ये कार्यरत नसतील अशा संस्थांकडून "शक्ती सदन" योजनेची अंमलबजावणी करण्याबाबतची ईच्छुकता मागविण्यात यावी. यासाठी प्रतिसाद देणा-या संस्थांची "परिशिष्ट अ" च्या आधारे तपासणी करुन निकष पूर्तता करणा-या संस्थांबाबतचा अहवाल जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांनी विभागीय उपायुक्त यांच्या मार्फत आयुक्त, महिला व बाल विकास यांचेकडे दि. ३१/०५/२०२४ पर्यंत पोहोचेल अशा प्रकारे सादर करावा.

III. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी उपरोक्त अहवाल व प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर त्यांची छाननी करुन ते एक महिन्यामध्ये स्वयंस्पष्ट शिफारशीसह शासनास सादर करावेत.

IV. उपरोक्त कार्यवाहीनंतर ज्या जिल्ह्यांमध्ये शक्ती सदन कार्यरत होऊ शकले नसेल त्या जिल्ह्यांमध्ये "शक्ती सदन" योजनेअंतर्गत नवीन संस्था निवडीसाठी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांच्या स्तरावरुन शासनाच्या मान्यतेने जाहिरात प्रसिध्द करण्यात यावी. संबंधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांनी जाहिरातीनुसार प्राप्त प्रस्तावांची छाननी "परिशिष्ट अ" च्या आधारे पूर्ण करुन पात्र ठरणारे प्रस्ताव विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास यांचेमार्फत आयुक्तालयास सादर करावेत. सदर प्रक्रिया एक महिन्यामध्ये पूर्ण करावी. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर एक महिन्यामध्ये त्यांची छाननी करुन स्वयंस्पष्ट शिफारशीसह शासनास सादर करावेत.

V. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचेकडून प्राप्त प्रस्ताव संदर्भाधीन क्र. ६ येथील शासन निर्णयान्वये गठीत प्रकल्प व्यवस्थापन समिती (Project Management Committee) समोर सादर करण्यात येतील. प्रकल्प व्यवस्थापन समितीकडून मंजूर प्रस्तावांची केंद्र शासनाच्या प्रकल्प मंजुरी समितीकडे (Project Approval Board) शिफारस करण्यात येईल.

VI. नवीन शक्ती सदन निवडीची प्रक्रिया करताना सर्व निकषांवर पात्र ठरणा-या एकापेक्षा जास्त संस्था असल्यास केंद्र शासन किंवा राज्य शासनाच्या महिलांकरीताच्या निवासी योजना राबविण्याचा पूर्वानुभव असलेल्या स्वयंसेवी संस्थांना प्राधान्य देण्यात यावे.

VII. मिशन शक्तीच्या वाचा क्र. १ येथे नमूद मार्गदर्शक सूचनांनुसार वेगवेगळ्या महिला समूहांकरीता वेगवेगळे शक्ती सदन सुरू करण्याची मुभा देण्यात आलेली आहे. त्यानुसार अनैतिक व्यापारातून सुटका केलेल्या महिला व मुलींसाठी स्वतंत्र शक्ती सदन आणि निराधार/निराश्रित महिला (विधवा महिला, कुटूंबाने दुर्लक्षित केलेल्या सामाजिक व आर्थिक पाठबळाशिवाय राहणाऱ्या महिला, नैसर्गिक आपत्तीमध्ये बेघर झालेल्या महिला, कुटुंबाने आधार काढून घेतलेल्या निराधार महिला), कौटुंबिक हिंसाचारात बळी पडलेल्या, बेघर महिला, लैंगिक शोषणाला बळी पडलेल्या महिला व मुली व अन्य वंचित महिलांकरीता स्वतंत्र शक्ती सदन सुरु करण्यास मुभा देण्यात येत आहे. तसेच मतिमंद/दिव्यांग महिलांसाठी शक्ती सदन सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाशी समन्वय साधून सुरु करता येईल.

## २. प्रशासकीय तरतुदी

### I. घटक निहाय खर्च -

कमाल ५० प्रवेशित क्षमतेच्या शक्ती सदनांकरीता वार्षिक खर्चमर्यादा पुढ़ीलप्रमाणे विहीत करण्यात येत आहेः

| क्र. | घटक | दर | एकूण कमाल वार्षिक खर्चमर्यादा |
|---|---|---|---|
| १ | शक्ती सदनाचा व्यवस्थापन खर्च | - | रु. १२,८४,०००/- |
| २ | इमारतीचे भाडे - ("अ" दर्जा शहर) | प्रति चौ. मी. प्रती वर्ष रु. ६५०/- | रु. ६,५०,०००/- |
| | इमारतीचे भाडे - ("ब" दर्जा शहर) | प्रति चौ. मी. प्रती वर्ष रु. ४५०/- | रु. ४,५०,०००/- |
| | इमारतीचेभाडे - ("क"दर्जा शहर) | प्रति चौ. मी. प्रती वर्ष रु. ३००/- | रु. ३,००,०००/- |
| ३ | प्रती प्रवेशिता (आरोग्य विम्यासहित) | दरमहा रु. ५३००/- | रु. ३०,००,०००/- |
| ४ | प्रशासकीय खर्च | दरमहा रु. १५,०००/- | रु. १,८०,०००/- |
| ५ | जनधन योजना प्रति प्रवेशिता | दरमहा रु. ५००/- | रु. ३,००,०००/- |
| ६ | सुटका, प्रत्यार्पण, पुन:एकात्मिकरण (प्रति वर्ष) | - | रु. २,५०,०००/- |

**अ)** संस्थांना शक्ती सदन सुरु करण्याकरीता किमान ७०० चौ.मी. व कमाल १००० चौ.मी इतके क्षेत्रफळ असलेली इमारत भाडेतत्वावर संपादीत करणे आवश्यक राहील. इमारत बांधकामासाठी निधी उपलब्ध करुन देण्यात येणार नाही.

आर्थिक वर्ष २०२२-२३ व २०२३-२४ मध्ये कार्यरत असलेल्या "स्वाधार" व "उज्ज्वला" गृहांच्या उक्त आर्थिक वर्षामधील इमारत भाड्याची गणना करताना उपरोक्त निकषांपेक्षा कमी क्षेत्रफळ असल्यास त्या त्या वर्षीच्या संस्थेच्या भाड्याची गणना प्रत्यक्ष क्षेत्रफळाच्या आधारे उपरोक्त बाब क्रमांक २ नुसार विहीत दरांनी करण्यात यावी. तथापि सदर मुभा ही केवळ आर्थिक वर्ष २०२२-२३ व २०२३-२४ पुरतीच मर्यादीत असेल.

**आ)** सदनातील प्रवेशितांना सामाजिक सुरक्षा योजनांचा लाभ (आयुष्यमान भारत योजना किंवा तत्सम योजना, अपंगत्व पेन्शन अंतर्गत वैद्यकिय लाभासह) घ्यायचा असल्यास स्वयंसेवी संस्थेने संबंधित विभागांशी समन्वय साधून लाभ मिळवून देण्याची प्रक्रीया पूर्ण करावी. सदर लाभासाठी येणारा खर्च हा उपरोक्त बाब क्रमांक ३ येथे नमूद अनुदानातूनच भागविणे आवश्यक असेल.

**इ)** उपरोक्त बाब क्रमांक ५ येथे नमूद केल्यानुसार केवळ प्रवेशितांच्या जनधन बँक खात्यामध्ये लाभ देण्यात यावा. प्रवेशितेसोबत राहणा-या मुलांसाठी ही तरतूद लागू नाही. प्रवेशितेला सदर लाभाची रक्कम शक्ती सदनामधील निवासाच्या काळात खात्यातून काढता येणार नाही.

आर्थिक वर्ष २०२२-२३ व २०२३-२४ मध्ये कार्यरत असलेल्या “स्वाधार” व “उज्ज्वला” गृहांच्या प्रवेशितांना संबंधित संस्थेकडून हा लाभ तिच्या निवासाच्या कालावधीमध्येच दरमहा दिलेला असेल तर त्याची खातरजमा करुन त्याची प्रतिपूर्ती संस्थेस करण्यात यावी.

**ई)** उपरोक्त बाब क्रमांक ६ येथील सुटका, प्रत्यार्पण, पुन:एकात्मिकरण या घटकासाठीचा खर्च हा अनैतिक मानवी वाहतूकीतून सुटका करण्यात आलेल्या महिला व मुलींसाठी शक्ती सदन चालविणा-या संस्थांकरीताच मर्यादीत असेल.

**उ)** आर्थिक वर्ष २०२२-२३ व २०२३-२४ मध्ये कार्यरत असलेल्या “स्वाधार” व “उज्ज्वला” गृहांचे त्या त्या आर्थिक वर्षांसाठीचे मूल्यनिर्धारण करताना उपरोक्त तक्त्यामध्ये विहीत निकष व दरांनुसार करण्यात यावे.

**II. मनुष्यबळ:-**

“शक्ती सदन” या घटक योजनेंतर्गत आवश्यक असलेले मनुष्यबळ पुढील प्रमाणे असेलः

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | निवासी अधिक्षक (केवळ महिला) | १ |
| २ | कार्यालयीन सहायक | १ |
| ३ | बहुउद्देशिय कर्मचारी | २ |
| ४ | स्वयंपाकी | २ |
| ५ | सुरक्षा रक्षक | ३ |
| | **एकूण** | ९ |

**अ)** उपरोक्त कर्मचाऱ्यांसाठीच्या अर्हता “शक्ती सदन” योजनेच्या मार्गदर्शक सुचनांमध्ये नमूद केल्यानुसार असतील, या कर्मचा-यांच्या वेतनावरील खर्च हा परिच्छेद **क्र. २.I** येथे नमूद अनुदानातून भागविण्यात यावा.

**आ)** आर्थिक वर्ष २०२२-२३ व २०२३-२४ मध्ये कार्यरत असलेल्या “स्वाधार” व “उज्ज्वला” गृहांच्या मनुष्यबळाच्या वेतनावरील खर्चाची गणना शक्ती सदन योजनेसाठी विहीत मनुष्यबळाच्या पुढे दिलेल्या तक्त्यामधील समकक्षतेप्रमाणे करण्यात यावी.

| **क्र.** | **शक्ती सदन योजनेमधील पदे** | **स्वाधार योजनेमधील समकक्ष पदे** | **स्वाधार योजनेमधील समकक्ष नसलेली पदे** | **उज्ज्वला योजनेमधील समकक्ष पदे** | **उज्ज्वला योजनेमधील समकक्ष नसलेली पदे** |
|---|---|---|---|---|---|
| १ | निवासी अधिक्षक (१) | निवासी अधीक्षक (१) | - | Project Director (1) | - |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २ | कार्यालयीन सहायक (१) | कार्यालय सहायक तथा डीईओ (१) | – | Clerk cum Accountant (1) | – |
| ३ | बहुउद्देशिय कर्मचारी (२) | – | – | - | – |
| ४ | स्वयंपाकी(२) | – | – | - | – |
| ५ | सुरक्षा रक्षक(३) | सुरक्षा रक्षक/पहारेकरी (२) | – | Guard (2) | – |
| ६ | – | – | समुपदेशक (१) | - | Doctor(Part time) (1) |
| ७ | – | – | वैद्यकीय अधिकारी (अर्धवेळ) (१) | - | Psychiatrist (Part time) (1) |
| ८ | – | – | – | - | Social Worker (2) |
| ९ | – | – | – | - | Clinical Psychologist(1) |

उपरोक्त नमूद केल्यानुसार जी पदे शक्ती सदन घटकांतर्गत नमूद नाहीत तथापि, सद्यस्थितीत कार्यरत असतील त्या पदावरील कर्मचाऱ्यांचे वेतन पूर्वीच्या योजनांप्रमाणे अदा करण्यात येईल. तथापि, सदर मुभा ही केवळ आर्थिक वर्ष २०२२-२३ व २०२३-२४ पुरतीच मर्यादीत असेल.

**III. अन्य प्रशासकीय यंत्रणांशी समन्वय:-**

**अ)** शक्ती सदन व वन स्टॉप सेंटर (OSC) यांनी एकत्रितरित्या मानवी तस्करी विरोधी युनिट/महिला मदत कक्ष तसेच पोलीस स्टेशनमध्ये मदतीसाठी असणाऱ्या सामाजिक संस्थांचे नेटवर्क तसेच महिला गट, युवक गट, पंचायत संस्था, हॉटेल्स व सहल व्यवस्थापक आणि इतर सामाजिक संस्था यांचेशी समन्वय साधून कार्य करावे.

**आ)** शक्ती सदन संस्थांनी मानवी तस्कर, संशयित व्यक्ती तसेच संकटग्रस्त कुटुंब याबाबत माहिती गोळा करणे, तसेच पिडितांना आवश्यक कागदपत्रांची पूर्तता करण्यासाठी व गुन्हा नोंदणीमध्ये मदत करणे इत्यादी कार्यवाही करणे अपेक्षित आहे.

**इ)** अनैतिक मानवी वाहतूकीतून सुटका करण्यात आलेल्या महिला व मुलींसाठी शक्ती सदन चालविणा-या संस्थांनी शोषणाच्या ठिकाणाहून अनुक्रमे महिला व बालकांच्या सुटकेसाठी दंडाधिकारी किंवा बाल कल्याण समिती यांच्याकडे अर्ज करणे तसेच वाचा क्र. ५ येथील शासन निर्णयातील परीच्छेद आ.८ मध्ये नमूद केल्यानुसार मानवी तस्करी विरोधी युनिट्सना सुविधा उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही करावी.

**३. योजनेचे व्यवस्थापन:-**

I. शक्ती सदन योजनेचे राज्यस्तरीय संनियंत्रण वाचा क्र. ६ येथील शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या "राज्यस्तरीय समिती" कडून करण्यात येईल.

II. योजनेचे जिल्हा स्तरावर सर्वसाधारण संनियंत्रण वाचा क्र. ७ येथील शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या जिल्हास्तरीय संनियंत्रण समितीकडून करण्यात येईल. या समितीसंबंधीचे सर्व कामकाज जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी कार्यालयाकडून करण्यात यावे. सदर समिती संबंधित जिल्ह्याकरीता शक्ती सदनाचा वार्षिक कृती आराखडा तयार करेल. समितीची

प्रत्येक तिमाहीत किमान एकदा बैठक घेण्यात येईल. प्रत्येक बैठकीचा अहवाल शासनास सादर करण्याची जबाबदारी समितीचे सदस्य सचिव यांची असेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०३०७१४१४५६८९३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KHADIJA FAROOQUE NAIKWADE

Digitally signed by KHADIJA FAROOQUE NAIKWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=8cd35f5dfe17a9e9a0cd531b6bb11d782183e791bc817e7a736def213ac7d71b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6F53F8BF0DEB07218B68698BE9E71A15840F8812D6E796D15093EAEC9A19F0DF, cn=KHADIJA FAROOQUE NAIKWADE
Date: 2024.03.07 14:25:27 +05'30'

**( ख. फा. नाईकवाडे )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय,
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष/ सदस्य, विधानसभा/ विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई,
५) मा.मंत्री, महिला व बाल विकास यांची खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६) मा.मंत्री, (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
८) सर्व विधानसभा सदस्य/विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई,
९) मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य यांचे उपसचिव,मंत्रालय,मुंबई,
१०) सर्व विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई,
११) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा),
१२) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानपरिषद),
१३) आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे,
१४) जिल्हाधिकारी, (सर्व)
१५) प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ शाखा, मुंबई,
१६) सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य विधी सेवा प्राधिकरण, मुंबई,
१७) सदस्य सचिव, जिल्हा विधी सेवा प्राधिकरण, सर्व (आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे, यांचे मार्फत)
१८) सचिव, राज्य माहिती आयोग, मुंबई
१९) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
२०) महालेखापाल, महाराष्ट्र ½ (लेखा व अनुज्ञेय) मुंबई /नागपूर,
२१) महालेखापाल, महाराष्ट्र ½ (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर,
२२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
२४) जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी सर्व (आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे, यांचे मार्फत)
२५) सर्व मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची मध्यवर्ती कार्यालये, महाराष्ट्र राज्य,
२६) निवडनस्ती, महिला व बाल विकास विभाग ( कार्यासन -०३).

## शासन परीपत्रक क्रमांक- केंपुयो-२०२२/प्र.क्र.१२५/का-०३ परिशिष्ट अ

## शक्ती सदन निवडीकरीता तपासणी सूची

१. विभागीय उपायुक्त छाननी/ शिफारस
२. जिल्हा महिला बाल विकास अधिकारी यांची शिफारस
३. संस्था नोंदणी अधिनियम (अधिनियम १८६० नुसार) संस्थेचे नोंदणी प्रमाणपत्र
४. निती आयोगाच्या पोर्टलवरील संस्थेचा नोंदणी क्रमांक व दिनांक
५. संस्थेचे घटना पत्रक/ ठराव
६. संस्थेच्या कार्यकारी मंडळाचे अधिकार, कर्तव्य, जबाबदाऱ्या, यांची यादी
७. कार्यरत संस्थेचा मागील ३ वर्षाचा वार्षिक अहवाल
८. बँकेतील मुदत ठेव (किमान रु. १५लाख)
९. किमान ताळेबंद (रु. २० लाख)
१०. अर्हताप्राप्त कर्मचारी वर्ग
११. भाडे करार पत्र / स्वत:ची इमारत असेल तर सार्वजनिक बांधकाम विभागाचे भोगवटा प्रमाणपत्र
१२. सुविधाजनक शयनकक्ष
१३. भोजनगृह/सभागृह
१४. पुरेशी स्नानगृहे
१५. पुरेशी स्वच्छतागृहे
१६. रुग्णासाठी स्वतंत्र खोली
१७. प्रशिक्षण कक्ष
१८. पाळणाघर
१९. शिक्षण कक्ष
२०. मनोरंजन कक्ष
२१. स्वयंपाकगृह
२२. मोकळी जागा
२३. १० फुट संरक्षक भिंत
२४. सी.सी. टिव्ही कॅमेरा